वितरण आदेश क्रमांक:- ८
सन २०१४-१५

राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत मंजूर तरतूदीमधून "वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,नागपूर" या संस्थेमध्ये एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्याकरिता, पायाभूत सुविधांच्या कामांस सहायक अनुदानामधून प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत. (सन २०१४-१५ योजनांतर्गत)

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांक : टीआरएन -२०१४/१३९०/प्र.क्र.२०३/१४/१२-अ,
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च ,२०१५

**संदर्भ :-** १. सामान्य प्रशासन विभाग,शासन परिपत्रक क्र.बीयुडी२०१४/प्र.क्र.९१/२०१४/२५, दि.९ एप्रिल,२०१४.
२. वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थसं-२०१४/प्र.क्र.६६/अर्थसंकल्प-३, दि.१७.४.२०१४.
३ वित्त विभाग, परिपत्रक क्र. अंदाज/२०१४ प्र .क्र.११०/अर्थसंकल्प-३, दि.१ जुलै २०१४.
४. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक:- टीआरएन -२०१४/प्र.क्र.१११/१४/१२-अ, दि.२०.५.२०१४
५. सामान्य प्रशासन विभाग,शासन परिपत्रक क्र.बीयुडी२०१४/प्र.क्र.९१/२०१४/२५, दि. ३ जुलै, २०१४
६.वित्त विभाग, परिपत्रक क्र. अंदाज/२०१३ प्र .क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि.२ जानेवारी, २०१५ व दि.९ फेब्रुवारी, २०१५.
७. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर यांचे
अ)VANAMATI/७५२/२०१४ , दि. १५.४.२०१४
ब) क्र.वनामती/CPTP /प्रस्ताव/ २५०३/२०१४, दि. ७.११.२०१४
क) क्र.वनामती/CPTP /प्रस्ताव/ ६९०/२०१५, दि.१०.३.२०१५ चे पत्र.
८.सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक:-टीआरएन-२०१४/१५६२/प्र.क्र.२४२/१४ १२-अ, दि.२६.०३.२०१५.
९. सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय क्रमांक:--टीआरएन-२०१४/प्र.क्र.१११/१४/१२-अ, दिनांक.२७.०३.२०१५.

**प्रस्तावना :-**

राज्य प्रशिक्षण धोरणानुसार वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर या संस्थेमध्ये एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमाच्या अनुषंगाने दि.९.६.२०१४ पासून वर्ग-२ च्या विविध संवर्गातील एकूण १४९ अधिकाऱ्यांकरिता, २२ आठवडयांचे प्रशासकीय व तांत्रिक स्वरुपाचे प्रशिक्षणाचे वर्ग घेण्याचे निश्चित करण्यात आले होते . त्यामुळे संस्थेने या प्रशिक्षणाच्या अनुषंगाने प्रशिक्षणार्थ्यांकरिता संस्थेमध्ये सोई व सुविधा तातडीने उपलब्ध करुन घेण्याची गरज लक्षात घेऊन,

तत्कालीन संचालक, वनामती,नागपूर यांच्या मान्यतेने, संस्थेमध्ये आवश्यक बाबींचे नूतनीकरण व इतर अनुषंगिक बाबीं पूर्णत्वास आणून, संस्था प्रशिक्षणाकरिता सुसज्ज करुन, सदर प्रशिक्षण संस्थेमध्ये घेतले.

या प्रशिक्षणाच्या अनुषंगाने, संस्थेमध्ये नूतनीकरण व इतर अनुषंगिक बाबींच्या खर्चाकरिता एकूण रु. १७०.९६ /-लाख इतका खर्च झालेला असून, त्यापैकी, रु. ५.२४ /- लाख इतका खर्च संस्थेने केलेला आहे. तसेच, रु. ५३.०५ /-लाख इतका निधी या कार्यासनाच्या दि.२०.५.२०१४ च्या शासन निर्णयान्वये संस्थेस वितरित करण्यात आला आहे. संस्थेने आता उर्वरित रु.१,१२,६६,५४३/-(अक्षरी रूपये एक कोटी, बारा लाख, सहासष्ठ हजार, पाचशे त्रेचाळीस फक्त) एवढी तरतूद उपलब्ध करुन देण्याचे संदर्भाधीन क्र. ७ च्या पत्राव्दारे प्रस्तावित केले आहे. या निधीसंदर्भात केलेल्या कामाचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

| **अ.क्र.** | **बाबनिहाय कामाचे विवरण** | **रक्कम** |
|---|---|---|
| १ | वातानुकुलीत यंत्रणा | १६,६३,७९०.०० |
| २ | एलइडी यंत्रणा | २,८५,०१३.०० |
| ३ | संगणक सुविधा | ३०,६९,३२६.०० |
| ४ | लायब्ररी बुक्स | ७,०८०.०० |
| ५ | रंगरंगोटी खर्चाबाबत | ३०,७२०.०० |
| ६ | किरकोळ कामे | ६२,१०,६१४.०० |
| | **एकूण** | **१,१२,६६,५४३.०००** |

उपरोक्त तक्त्यातील बाबनिहाय सर्व कामे संस्थेच्या तत्कालीन संचालक, (भा.प्र.से.) वनामती, नागपूर, यांनी, त्यांना प्रदान केलेल्या शक्तीचा वापर करून, निविदा पध्दतीने, दरकरारानुसार व कोटेशनमार्फत, कार्यालयीन आदेश देऊन पूर्ण केलेली आहेत.

२. महाराष्ट्र राज्याचे प्रशिक्षण धोरण मंत्रीमंडळाच्या मान्यतेने दि.२३.९.२०११ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आले आहे. सदर धोरणाच्या अंमलबजावणीसाठी **“मागणी क्र. ए-०४ २०७०-इतर प्रशासकीय सेवा ००३-प्रशिक्षण (००)(१०)- राज्य प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यासाठी विविध सुविधा व सहाय्य यावरील खर्च (२०७० ०८५३) ३१-सहायक अनुदान योजनांतर्गत”** या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाकरिता एकूण रु.१०४९.९९ लाख इतकी तरतूद अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये करण्यात आली असून या तरतूदीच्या अनुषंगाने, संदर्भाधीन क्र. १ च्या शासन परिपत्रकान्वये एप्रिल ते जुलै, २०१४ या ४ महिन्यांसाठी एकूण रु.३५०.०० लाख एवढे लेखा अनुदान नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधिन करण्यात आले होते. त्यापैकी संदर्भाधीन क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये रामेती पुणे, नाशिक प्रबोधिनी व वनामती, नागपूर

या संस्थांना अनुक्रमे रु. ६५.००/- लाख,रु. ६२.००/- लाख व रु. ५३.०५/- लाख अशा एकूण रु.१,८०,०५,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी, ऐंशी लाख, पाच हजार फक्त ) एवढ्या योजनेतर सहायक अनुदानास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देऊन, निधी वितरित करण्यात आला आहे.

आता संदर्भाधीन क्र.५ च्या परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये केलेल्या तरतूदीच्या अनुषंगाने संपूर्ण अनुदान नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधिन करण्यात आले आहे. संदर्भाधीन क्र.६ च्या परिपत्रकानुसार एकूण अर्थसंकल्पीय अनुदानाच्या ७५% च्या मर्यादेत,**रु.७,८७,४९,२५०/- (अक्षरी रूपये सात कोटी,सत्त्याऐंशी लाख,एकोणपन्नास हजार, दोनशे पन्नास फक्त)** इतके सहायक अनुदान सदर लेखाशिर्षाअंतर्गत उपलब्ध आहे. त्यापैकी वरील रू,१,८०,०५,०००/- व नाशिक महसूल प्रशिक्षण प्रबोधिनीस संदर्भ क्र.८ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेले रू.२८,१९,७००/- व संदर्भ क्र.९ च्या शासन निर्णयान्वये रा.प्र.नि.मू.यं,यशदा,पुणेला वितरीत करण्यात आलेले रू.४,१९,७५,०००/- व रामेती,खोपोली,रायगड या संस्थेस वितरीत करण्यात आलेले रू.३६,१२,६७१/-अशी एकूण रू.६,६४,१२,३७१ /-इतकी रक्कम वजा करता **रू.१,२३,३६,८७९/-(अक्षरी रूपये एक कोटी,तेवीस लाख,छत्तीस हजार, आठशे एकोणऐंशी फक्त)** इतकी रक्कम वितरणासाठी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आली आहे.

सदर तरतूदीपैकी रु.१,१२,६६,५४३/-(अक्षरी रूपये एक कोटी, बारा लाख, सहासष्ठ हजार, पाचशे त्रेचाळीस फक्त) एवढी रक्कम उपलब्ध करुन देण्याचे संचालक, " वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर यांनी संदर्भाधीन क्र. ७ च्या पत्राव्दारे प्रस्तावित केले आहे. त्यानुषंगाने या संस्थेमध्ये केलेल्या कामांना **प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब** शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

राज्य प्रशिक्षण धोरणानुसार वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर या संस्थेमध्ये एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमाच्या अनुषंगाने, सदर अनुदानाच्या मर्यादेत प्रस्तावनेतील विविध बाबींकरिता **रु.१,१२,६६,५४३/-(अक्षरी रूपये एक कोटी, बारा लाख, सहासष्ठ हजार, पाचशे त्रेचाळीस फक्त)** इतक्या खर्चास वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग- दोन, अ.क्र. १८, नियम क्र.६८ व अनुक्र.२८ (अ), नियम क्र. ७६ तसेच, उपविभाग- दोन मधील संबंधित नियम अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या शक्तींचा वापर करुन व सदर अधिकारातील रकाना क्र.६ खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकिय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी होणारा **रु.१,१२,६६,५४३/-(अक्षरी रूपये एक कोटी, बारा लाख, सहासष्ठ हजार, पाचशे त्रेचाळीस फक्त)** इतका खर्च **"मागणी क्र. ए-०४,२०७०-इतर प्रशासकीय सेवा ००३-प्रशिक्षण (००)(१०)- राज्य प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यासाठी विविध सुविधा व सहाय्य यावरील खर्च (२०७० ०८५३) ३१-सहायक अनुदान वेतनेतर"** या लेखाशीर्षाखाली २०१४-२०१५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

**३.** सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान तात्काळ कोषागारातून आहरित करुन सदर अनुदानाची संबंधित कोषागारातून काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे.

**४.** संस्थेने आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर व शासनाला सदर विनियोग प्रमाणपत्रात बाबनिहाय तपशीलवार खर्चाची नोंद घेऊन तातडीने सादर करावे.

**५.** वसंतराव नाईक प्रादेशिक कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था ( वनामती ), नागपूर, या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार, महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

**६.** हा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या मान्यतेने अनुक्रमे संदर्भ क्र. १०४/१४४३, दि.२३.०३.२०१५ व अनौ.संदर्भ क्र.३२३/१५/व्यय ४, दि.२७.०३.२०१५ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१५०३३११२१४५६१८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PATIL PRATIBHA MADHAV

Digitally signed by PATIL PRATIBHA MADHAV
DN: CN = PATIL PRATIBHA MADHAV, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = GAD,CID - 916982
Date: 2015.03.31 12:28:44 +05'30'

**( प्रतिभा मा. पाटील )**
**कार्यासन अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग.**

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.

३. मा.अपर मुख्य सचिव ( सेवा ), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

४. मा.प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

५. मा. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

६. महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे.

७. उपमहासंचालक, राज्य प्रशिक्षण नियंत्रण व मूल्यमापन यंत्रणा, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे.

८. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, वनामती,नागपूर.

९. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.

१०. नियोजन विभाग, ( कार्यासन १४४३ ),मंत्रालय,मुंबई-३२.

११. वित्त विभाग (व्यय-४/अर्थसंकल्प-१४), मंत्रालय, मुंबई-३२.

१२. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग/का.क्र.२५.

१३. निवड नस्ती.